अति-तात्काळ

प्रति, प्र.स (अपरसु) यांचे स्टाफ ऑफिसर
गृह विभागातील सर्व प्रशासकिय कार्यासने
गृह विभागाच्या अखत्यारितील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख

क्रमांक:-एचडीओ-०२०४/सीआर-६५/आस्थापना-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
दिनांक:- १६ जून,२००४

विषय:- शासकिय विभाग/कार्यालयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे भरण्यास परवानगी देण्याबाबत.

संदर्भ:- शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/ (भाग-५)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ७.६.२००४

१८/६

उपरोक्त विषयाबाबतच्या वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग-५)/२००४, वित्तीय सुधारणा-१, दि.७.६.२००४ ची प्रत आवश्यक कार्यवाहीसाठी सोबत जोडली आहे.

स. १८/६

..२८/६/२००४
( मा. का. शिर्के )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**शासकीय विभाग/ कार्यालयांमधील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे भरण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-५)/२००४/वित्तीय सुधारणा-१**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ७ जून २००४**

संदर्भ :- (१) शासन निर्णय,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर २००१
(२) शासन निर्णय,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/(भाग-२)/२००१/वित्तीय सुधारणा,दिनांक २६ फेब्रुवारी २००२
(३) शासन निर्णय,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९//(भाग-३)/२००१/वित्तीय सुधारणा,दिनांक ९ जानेवारी २००३
(४) शासन निर्णय,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.८५/२००३/ वित्तीय सुधारणा, दिनांक २१ जानेवारी २००३
(५) शासन निर्णय,क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९//(भाग-४)/२००१/ वित्तीय सुधारणा,दिनांक २६ मार्च २००४

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या महसूली उत्पन्नाच्या तुलनेमध्ये निरनिराळ्या शासकीय विभाग आणि कार्यालयांचा प्रशासकीय खर्च वाढल्यामुळे सदर प्रशासकीय खर्च शक्य त्या प्रमाणात कमी करण्यासाठी शासनाने विविध स्वरुपाच्या काटकसरीच्या उपाययोजना लागू केलेल्या आहेत. त्याचाच एक महत्वाचा भाग म्हणून सर्व शासकीय विभाग आणि कार्यालयांच्या आस्थापनेवरील सर्व मंजूर पदांचा सर्वंकष आढावा घेऊन अनावश्यक ठरलेल्या योजना/ कार्यक्रम रद्द करुन त्याचबरोबर अनावश्यक ठरणारी रिक्त पदे रद्द करणे, अनावश्यक ठरणारी कार्यरत पदे अतिरिक्त ठरविणे आणि अतिरिक्त ठरलेल्या कर्मचाऱ्यांना व अधिकाऱ्यांना वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करणे याबाबतची आवश्यक ती कार्यवाही करण्याचे शासकीय आदेश, शासन निर्णय वित्त विभाग दि. १०.९.२००१ अन्वये सर्व शासकीय विभाग आणि कार्यालयांना देण्यात आले होते. तद्नुसार सर्व शासकीय विभाग आणि कार्यालयांतील मंजूर पदांचा आढावा घेऊन पदांच्या सुधारित आकृतीबंधाला प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग. आणि प्रधान सचिव (प्र.सु.व र.व का.)सामान्य प्रशासन विभाग यांच्या संयुक्त समितीची आणि अंतिमतः मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता प्राप्त करुन घेणे बंधनकारक आहे.

२. तथापि, निरनिराळ्या स्वरुपाच्या प्रशासकीय व तांत्रिक अडचणींमुळे अद्यापही काही शासकीय विभाग आणि कार्यालयांचे पदविषयक सुधारित आकृतीबंध निश्चित झालेले नसल्यामुळे शासकीय विभाग आणि कार्यालयातील रिक्त पदे भरणे शक्य होत नव्हते. तसेच शासकीय विभाग आणि कार्यालयातील आरक्षणाच्या पदांपैकी ९० टक्के पदे संयुक्त समितीच्या आणि उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेशिवाय भरण्यास शासनाने यापूर्वीच दि. ९ जानेवारी २००३ च्या शासन निर्णयानुसार मान्यता दिली असल्यामुळे त्याच धर्तीवर खुल्या प्रवर्गामधील रिक्त पदे भरण्यासाठी सुध्दा शासनाने मान्यता द्यावी अशा प्रकारची मागणी कर्मचारी संघटनांकडुन वेळोवेळी करण्यात आली होती. त्यास अनुसरुन खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तद्नुसार शासनाने आता शासकीय विभाग आणि कार्यालयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे भरण्यासंदर्भात घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय वित्त विभाग दि. १०.९.२००१ च्या तरतुदीमध्ये खाली नमूद केल्याप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/ वित्तीय सुधारणा दिनांक : १० सप्टेंबर २००१ च्या विद्यमान परिच्छेद ४.१ ऐवजी खालील प्रमाणे सुधारित परिच्छेद ४.१ समाविष्ट करण्यात यावा.

**सुधारित परिच्छेद :-**

४.१ : सर्वसाधारणपणे शासकीय विभाग आणि कार्यालयांच्या पद विषयक आढाव्याच्या सुधारित आकृतीबंधाला उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिल्याशिवाय कोणत्याही शासकीय विभाग अथवा कार्यालयाला कोणतीही रिक्त पदे भरता येणार नाहीत तथापी ज्या प्रशासकीय विभाग आणि कार्यालयांचे पदविषयक आढावे पुर्ण झालेले नाहीत अथवा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला नाही अशा शासकीय विभाग आणि कार्यालयांमधील सद्या रिक्त असलेल्या खुल्या प्रवर्गातील पदांच्या कमाल ५० टक्के पर्यंत एवढी रिक्त पदे संयुक्त समिती तसेच उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेशिवाय भरण्यासाठी सर्व शासकीय विभाग आणि कार्यालयांना परवानगी देण्यात येत आहे. अशाप्रकारे खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे भरतांना वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षामधील उपलब्ध असलेल्या समकक्ष / समतुल्य कर्मचारी / अधिकाऱ्यांना नियुक्तीसाठी प्राधान्य देण्यात यावे. तद्नुसार सर्व संबंधित शासकीय विभाग आणि कार्यालयांनी रिक्त पदे भरण्याकरिता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १० सप्टेंबर २००१ च्या परिशिष्ट तीन -क अन्वये विहीत केलेल्या मागणीपत्रानुसार आवश्यक त्या कर्मचारी / अधिकाऱ्यांची मागणी वित्त विभागाकडे सादर करावी. परंतु संबंधित शासकीय विभाग / कार्यालयांनी विहित मागणीपत्रानुसार केलेल्या मागणीप्रमाणे आवश्यक ते समकक्ष/समतुल्य कर्मचारी / अधिकारी वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे उपलब्ध नसल्यास वित्त विभागाकडून त्या संबंधित शासकीय विभागाला / कार्यालयाला रिक्त पदे भरण्यासाठी ना-हरकत प्रमाणपत्र देण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

विनोद कुळकर्णी
शासनाचे उप सचिव

प्रति

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई

ते ३८ पर्यंतचे पत्ते मंत्रालयाच्या सर्व प्रशासकिय नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख